# महाराष्ट्र शासन

क्रमांक : गौखनि -४१ अ/०७१४/प्र.क्र.३३३/ख

महसूल व वन विभाग
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०५/०१/२०१९

**विषय : गौण खनिज - बीड**

मौजे गुळज, ता. गेवराई या वाळूगटातून मंजूर वाळूचे उत्खनन न करता आल्याने प्रमाणशीर रक्कम परत करणेबाबत.
श्री. विनोद श्रीकृष्णराव तांबे.

शासन ज्ञापन महसूल व वन विभाग क्र. गौखनि ३९/०३१०/प्र.क्र. ७६/ख, दि. ५.१२.२०१२ निरसित करण्यात येवून सुधारित ज्ञापन खालीलप्रमाणे :-

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी बीड यांना त्यांचे पत्र क्र. २०१३/गौख/वा.लि.- २००८-०९/कावि, दि. १६.७.२०१३, क्र. २०१३/गौख/वा.लि.२००८-२००९/कावि, दि.१०/०७/२०१४, क्र.२००९/ गौख/वा.लि./कावि/३५, दि.१९/१०/२०१६ च्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २००९ करिता मौजे हिरडपुरी, ता. पैठण, जि. औरंगाबाद व मौजे गुळज, ता. गेवराई, जि. बीड या संयुक्त वाळूगटातील १०२५७ ब्रासचा वाळूसाठा रू. ७८,३१,०००/- इतक्या सर्वोच्च बोलीस श्री. विनोद तांबे यांना मंजूर करण्यात आला होता.

मौजे हिरडपुरी या वाळूगटाचा ताबा लिलावधारकास देण्यात आला व लिलावधारक यांनी सदर वाळूगटातून मंजूर (७४२० ब्रास) वाळूचे पूर्णपणे उत्खनन केले. तथापि, मौजे गुळज, ता. गेवराई, जि. बीड या वाळूगटात पाणी असल्याने सदर वाळूगटातून वाळूचे उत्खनन करता आले नाही. त्याअनुषंगाने लिलावधारक यांनी उक्त वाळूगटाची शासनजमा केलेली रक्कम परत करण्याची विनंती केली. शासन ज्ञापन दि.५/१२/२०१२ अन्वये श्री. विनोद तांबे यांना मौजे गुळज या वाळूगटातील २८३७ ब्रास करिता रू.२१,६४,६३१/- परतावा करण्यास मंजूरी देण्यात आली.

जिल्हाधिकारी बीड यांनी दि.१६/०७/२०१३ च्या पत्रान्वये सदर वाळूगटाची रक्कम लिलावधारकास परत करणे योग्य नाही असे शासनास कळविले. तसेच लिलावधारकाने दि.०८/०५/२०१४ च्या अर्जान्वये तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांचेकडे मुदतवाढ अथवा रक्कम परत करण्याबाबत विनंती केली. त्याअनुषंगाने तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांनी दि.३१/०७/२०१४ च्या आदेशान्वये लिलावधारक यांना शासन ज्ञापन दि.०५/१२/२०१२ अन्वये घेण्यात आलेला प्रमाणशीर परताव्याचा निर्णय कायम केला. तद्नंतर वित्त विभागाने उपस्थित केलेल्या मुद्यांच्या अनुषंगाने विभागाने तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांचे दि.३१/०७/२०१४ च्या आदेशाचे पुनर्विलोकन करण्याचे प्रस्तावित केले.

दरम्यान लिलावधारक यांनी मा. उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.३१६५/२०१६ दाखल केली. मा. उच्च न्यायालयाने सदर याचिकेमध्ये

दि.२०/०४/२०१६ रोजी सहा महिन्यांत रक्कम परत करण्याचे आदेश पारित केले. सदर आदेशाचे पालन न झाल्याने याचिकाकर्ता यांनी शासनाविरूध्द अवमान याचिका क्र.७३४/२०१८ दाखल केली आहे.

दरम्यान मा. मंत्री (महसूल) यांनी दि.३०/११/२०१८ रोजीच्या आदेशान्वये विभागाचा पुनर्विलोकन अर्ज फेटाळून तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांचे दि.३१/०७/२०१४ चे आदेश कायम केले आहेत. त्याअनुषंगाने मौजे गुळज, ता. गेवराई, जि. बीड या वाळूगटाकरिता लिलावधारक श्री. विनोद श्रीकृष्णराव तांबे यांना उत्खनन न करता आलेल्या वाळूसाठी प्रमाणशीर रक्कम रू. २१,६४,६३१/- एवढ्या रकमेचा परतावा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सबब, लिलावधारक श्री. विनोद श्रीकृष्णराव तांबे यांना रु. २१,६४,६३१/- **(रुपये एकवीस लाख चौसष्ट हजार सहाशे एकतीस फक्त)** इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. याबाबीवर होणारा खर्च सन २०१८-१९ यावर्षाकरीता लेखाशिर्ष, ०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली उपलब्ध असलेल्या अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

४. सदर ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४५१/२०१८/व्यय-९, दिनांक १२.१२.२०१८ अनुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०५१७१२२७९६१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=8c2377ed235498603821d49922a210871ff6fb9b369722ac707aee7dcd87f2bd, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2019.01.05 17:23:12 +05'30'

**(दिनेश चव्हाण)**
अवर सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी बीड, बीड.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.

३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.

४) जिल्हा कोषागार अधिकारी बीड, बीड.

५) वित्त विभाग, (व्यय-९,अर्थसंकल्प -३, ६ व १४ कार्यासने) हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.

६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.

७) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.